संगणक सांकेतांक - 202004221441282319

COVID-१९ विषाणुच्या प्रादुर्भावामुळे पसरलेली रोगराई नियंत्रित करण्यासाठी उपाययोजना करण्यासाठी विभागीय आयुक्तांना निधी वितरित करण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
महसुल व वन विभाग
शासन निर्णय,क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.१२३/म-३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१ एप्रिल, २०२०

संदर्भ : १) केंद्र शासन,गृह मंत्रालय,यांचे पत्र क्र. ३३-४/२०२०-MDM-I, दिनांक १४ मार्च, २०२०
२) केंद्र शासन,गृह मंत्रालय,यांचे पत्र क्र. ३३-४/२०२०-MDM-I, दिनांक २८ मार्च, २०२०
३) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक: १६.०३.२०२०
४) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक : २८.०३. २०२०
५) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक : ०३.०४.२०२०

प्रस्तावना:

देशात व राज्यामध्ये COVID-१९ विषाणुचा प्रादुर्भाव झाल्यामुळे रोगराई नियंत्रित करण्याची आवश्यकता विचारात घेवून आवश्यक उपाययोजना करण्यासाठी राज्य कार्यकारी समितीची दिनांक १६ मार्च, २०२० रोजी मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार COVID-१९ विषाणुच्या प्रादुर्भावामुळे पसरणारी रोगराई नियंत्रित करण्यासाठी विलगीकरण कक्ष स्थापन करणे,त्यासाठी तात्पुरती निवासी व्यवस्था करणे, अन्न, कपडे, वैद्यकीय देखभाल इत्यादी तसेच अतिरिक्त चाचणी प्रयोगशाळा स्थापन करण्याचा खर्च, अग्निशमन, पोलीस,स्थानिक स्वराज्य संस्था व आरोग्य सेवेतील कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक संरक्षणासाठी प्रतिरोधक साधनांचा खर्च व व्हेंटीलेटर,हवा शुध्दीकरण यंत्र, थर्मल स्कॅनर्स व इतर साधनांचा खर्च भागविण्यासाठी सर्व जिल्हयांना राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून संदर्भाधीन क्रमांक ३ व ५ येथील शासन निर्णयान्वये जिल्हयांना एकूण रु ९० कोटी इतका निधी वितरित करण्यात आला आहे. या प्रयोजनासाठी जिल्हयांकडून विभागीय आयुक्तांमार्फत अतिरिक्त निधीची मागणी प्राप्त झालेली आहे. सदर मागणीनुसार निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

देशात व राज्यामध्ये COVID-१९ विषाणुचा फैलाव नियंत्रित करण्याची आवश्यकता विचारात घेवून विविध उपाययोजना करण्यासाठी जिल्हयांकडून विभागीय आयुक्तांमार्फत प्राप्त झालेल्या मागणीनुसार निधी मंजूर करण्यासाठी राज्य कार्यकारी समितीची दिनांक २० एप्रिल , २०२० रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार COVID-१९ विषाणुच्या फैलाव नियंत्रित करण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या बाबींसंदर्भातील उपाययोजना अंमलात आणण्यावरील खर्च भागविण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून (S.D.R.F.) एकूण रुपये ८१,००,००,०००/- (रुपये ऐक्क्याऐंशी कोटी फक्त ) इतका निधी विभागीय आयुक्तांमार्फत जिल्हयांना वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. विभागीय आयुक्तांनी आवश्यकतेनुसार बाधित जिल्हयांना निधी तात्काळ उपलब्ध करून दयावा.

C:\Users\medha gadgil\Desktop\कोरोना 16032020.docx

| अ.क्र | विभागीय आयुक्त | वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, कोकण | रु. ४० कोटी |
| २ | विभागीय आयुक्त, पुणे | रु. १५ कोटी |
| ३ | विभागीय आयुक्त, नागपूर | रु. १० कोटी |
| ४ | विभागीय आयुक्त, अमरावती | रु. ६ कोटी |
| ५ | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | रु. १० कोटी |
| एकूण | | रु. ८१ कोटी |

२. उपरोक्त निधी बीम्स प्रणालीवर सर्व विभागीय आयुक्तांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

३. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयातील सुचनांचे पालन करण्यात यावे व ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

४. वरील खर्च करण्यासाठी महसुल विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग व वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना कोषागारात देयक सादर करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

५. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०४) इतर बाबी, ३१ सहाय्यक अनुदाने (२२४५ ०२४४) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यात येत आहे. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या मर्यादेत भागविण्यात यावा.

६. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. तसेच राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे विभागीय आयुक्त यांनी संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करावीत.

७. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८१/व्यय-९/२०२०, दिनांक २१/४/२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(सु.ह.उमराणीकर)
उपसचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई

C:\Users\medha.gadgil\Desktop\कोरोना\16032020.docx

३. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
४. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
५. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
६. प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग ),जी.टी.हॉस्पीटल, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई,
८. संचालक (आरोग्य सेवा), महाराष्ट्र राज्य,मुंबई,
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०. सर्व जिल्हाधिकारी,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१३. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१६. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१७. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१८. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
२०. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )